लत करीत असे. त्या **मार्टिमराचे** लोक राजा जवळ सर्वत्र असत, म्हणून त्याजवळ कोणाचा प्रवेश होईना; तेव्हां सर्व राज्यांतील सत्ता, राणी आणि तो. **मार्टिमर** या दोघांजवळ राहिली. राणी आपली त्या **मार्टिमरावर** प्रीति होती ती लपवीत नसे.

शेवटीं ती त्यांची सत्ता प्रजांचे दृष्टीस कंटाळवाणी, आणि आपल्यास प्रतिबंध कारक, असें मनांत आणून, **एड्वर्डानें** ती नाहींशीं करायाचा निश्चय केला. परंतु त्या **मार्टिमराचें** सामर्थ्य असें होतें कीं, राज्यपदवी संपादन करायास जितका प्रयास लागावा, तितकाच त्यास काढून टाकायास पाहिजे होता. कांहीं दिवसपर्यंत राणी, आणि तो **मार्टिमर**, **नातिंगम** शहरचे किल्यांत राहत असत; त्या किल्यावर चांगला पहारा असे; त्याचे दरवाजे प्रतिदिवशीं सायंकाळीं लावीत; आणि त्यांचा किल्या राणीजवळ असत. म्हणून कितिएक

एक सभासद लोक आणि राजा यांणीं असें ठरविलें कीं, त्या किल्यांत न कळतां आऊन त्या दोघांस धरावीं. त्या करितां **सरविलियमब्लांड** म्हणून तेथील **गवर्नर** होता त्यास फितुर केला. त्या किल्यांत नळा सारिखी पूर्वी जमिनींतून वाट केली होती; ती दगड माती पडोन बुजली असें; आणि तेव्हां एक दोघांस मात्र ठाऊक होती. त्या **गवर्नरानें** त्या वाटेनें त्यांस आंत घ्यायाचें कबुल केलें. मग राजाचे पक्षाचे गृहस्थ एके रात्रीस त्या वाटेनें आंत गेले; तेव्हां **मार्टिमर** आपलें संरक्षण करायाचा उपाय नाहींसा झाल्यामुळें धरिला गेला. त्या वेळेस राणी आणि तो जवळजवळचे खोलींत होतीं. ती त्याचें संरक्षण करावयाविषयीं पुष्कळ त्यांजवळ बोलिली; आणि म्हणाली; माझे **मार्टिमरास** कृपा करून सोडून द्या; परंतु ते सभासद तें ऐकेनात. सारांश तिणें बहुत वेळ लोकांवर क्षमा केली नव्हती; त्याच रीतीनें तिज-

घर

वरही त्याणीं केली नाहीं. तेह्वां पार्लमेंटा-च्या सभासमय होता. त्या सभेंत त्यास बोलावून आणिला नाहीं, किंवा त्याचे अपराधाविषयीं साक्षी ही विचारिली नाहीं; आणि तत्क्षणींच त्याचा वध करावा असें ठरविलें. मग लंडुन शहरापासून सुमारें अर्ध कोशावर एल्म्स् ह्मणून ठिकाण आहे तेथें त्यास सुळीं दिला; आणि त्याचें शरीर तेथेंच दोन दिवस ठेविलें. राणीचा अपराध वास्तवीक त्यापेक्षां अधिक; परंतु तिची प्रतिष्ठा आणि कुल हीं मोटीं होतीं, ह्मणून तिला सोडिली. इतकें मात्र केलें कीं, तिला कशाची सत्ता नाहींशी करून रेझिंग्स् किल्यावर ठेविली, आणि चरितार्था करितां ३००० पौंड वर्षास द्यावे असें ठरविलें. या कैदेंतून पुढें ती कधींही मुक्त झाली नाहीं. राजा प्रतिवर्षीं कांहींशा समारंभानें एकवेळ तिचा भेटीस जाई; तथापि तिला असें वाटे कीं, माझेसारिखी या पृथ्वींत दुःखी कोणी नाहीं. अशो दुः-

खांत

खांत तिणें पंचवीस वर्षे घालविलीं. ही गोष्ट पाहून किमपि आश्चर्य वाटूं नये; सर्व मनुष्यांनीं आपले कर्माचीं फळें भोगावीं, असा ईश्वराचा संकेतच आहे.

लोकांची प्रीति यापेक्षें अधिक संपादावी ह्मणून, एडवर्ड राजा मोठा चढाव करून स्काटलंड देशांत गेला; तेव्हां हालिडौन डोंगराजवळ एक लढाई झाली; तीमध्यें सुमारें तीस हजार स्काट लोक मेले गेले. नंतर थोडेच दिवशीं त्याणें फ्रान्स देशाशीं ही युद्ध केलें. तो देश त्या वेळेस मोठ्ये हलाखींत होता. तें वर्तमान असें. फिलिप दि फेअर राजाचे तीन मुलगे होते; त्याणीं आपले बायकांनीं व्यभिचार केला असा त्यांवर पार्लमेंटांत आरोप ठेविला; त्यामुळें त्यांस जन्मवर बंदींत ठेविल्या. मग फ्रान्स देशचे राजपदावर लुइस ह्युटिन ह्मणून झाला. त्याणें आपले बायकोस मारिली, आणि तिचे जार होते त्यांचे आंगावरची चामडी

१. सुंदर.

डीं काढून त्यांचा वध केला. त्यास एकच मुलगी होती. तो मेल्यानंतर त्याचे पाठचा भाऊ फिलिप दि टॉल त्या मुलीस एकीकडे ठेवून, आपण राज्य विषयीं सत्ता करूं लागला. सालिक्‌ला ह्मणून राज्यनियम आहे, त्यांत असें आहे कीं, बायकोस राज्य करायाचा अधिकार नाहीं; तेणें करून तो आपणास सत्ता आहे असें ह्मणत असे एड्वर्ड राजाची आई फिलिफ दि फेअर राजाची मुलगी, आणि शेवटचे तीन राजांची बहीण, या नात्यानें एड्वर्ड राजाही त्या पदाविषयीं आपणास अधिकार आहे ह्मणून तंटा करूं लागला. हें करायाचे पूर्वीं त्याणें तो उद्योग केला असतां बरा किंवा वाईट ही मसलत पार्लमेंटास विचारिली. त्या सभेनें त्यास संमत दिलें; मग त्याणें फ्लांडर्स देशांतले लोकांशीं व्यापार करायाकरितां लोंकर[1] पुष्कळ जमा केली; आणि बहुत सैन्य तसेंच कितिएक मोटे सरदार बरोबर घेऊन तो तेथें निघोन

१ उंच

जाता झाला.

नंतर **फ्लांडर्स** देशाचे कांठावर पाण्यांतून लढाई झाली. तींत **इंग्लिश** विजय पावले. तेथें **फ्रेंचाचे** दोनशें तीस गलबतांचा नाश झाला; व तीस हजार खलाशी लोक, आणि दोन सरदार मेले गेले.

**एडुर्ड** राजा येऊन पोहोंचला, आणि त्याचें सैन्य सारे देशभर पसरून विध्वंस करूं लागलें, ही बातमी **फ्रेंचाचे** दरबारांत समजून तेथें मोठें भय उत्पन्न झालें. **इंग्लिशांनी कान** शहर घेऊन निर्दयपणानें लुटलें, आणि **पारिस** शहरापर्यंत सर्व गांवांचें तसेंच केलें. तेव्हां **फ्रेंच** लोकांनीं **एडुर्ड** राजाचें पुढें येणें होऊं नये, या करितां नद्यांचे पूल पाडायाची युक्ति योजिली. तेव्हां **फ्रान्स** देशचें राज्य **फिलिप** राजा करीत असे; त्याणें ही शत्रूंचें निवारण करायाविषयीं प्रयत्न चालविला. **एडुर्ड** राजा **सोम** नदी उतरून जाणार असें

समजून

समजून, त्याणें आपला एक **गाडिमर डी फे** ह्मणून सरदार होता, त्यास त्या नदीपाशीं ठेविलें; आणि आपण एक लक्ष योद्धे बरोबर घेऊन **इंग्लिशां** बरोबर लढाई करायास गेला.

कांहीं वेळ पर्यंत दोनही सैन्यें एकमेकाचे दृष्टीचे टप्प्यांत येऊन राहिलीं होतीं; आणि लढाईचा प्रारंभ केव्हां होईल याची उभयपक्षीं वाट पहात होतीं. त्या वेळेस **फ्रेंचांची** फौज एक लक्ष वीस हजार, आणि **इंग्लिशांची** तीस हजार होती. असें असतांही लढाई करून जें काय व्हायाचें असेल तें होऊ, असा **एडुर्ड** राजाचा निश्चय होता. तो **केसी** खेड्याजवळ तळ देऊन शत्रूनीं प्रथम हल्ला करावा, याची स्वस्थपणें वाट पहात बसला. त्याणें आपले फौजेच्या तीन टोळ्या केल्या. पहिले टोळीचा सरदार राजानें आपले मुलास केले; दुसरे टोळीचे **नर्थंप्टन** आणि **आरंदल**, एथील **अर्लास** केले; आ-

णि

णि तिसरी टोळी रिकामी ठेविली, ती आपले हाताखालीं राखिली.

इकडे **फिलिप** राजा मोठ्या गर्वानें आपली फौज पुष्कळ जाणून निश्चिंत बसला होता, युक्तीनें उद्योग करावा तें सोडून, तो शत्रूस कसा तरी लढायास लावावा हें इच्छित असे. त्याणेंही आपले फौजेच्या तीन टोळ्या करून **इंग्लिशांचे** समोर चालविल्या. पहिलींत **जिनोआ** देशाचे तिरकमटे वाल्हेपंधराशें होते. दुसरींत राजाचा भाऊ मुख्य होता, आणि तिसरींत स्वतः राजाच होता.

संध्याकाळचा दिवस एक प्रहर राहिला होता त्या वेळेस, **फ्रेंच** राजानें आपले तिरकमटे वाल्यांस लढाई सुरू करायाचा हुकुम दिला. परंतु ते पुष्कळ चालून आले त्या मुळें थकून गेले होते; म्हणून त्याणीं विनंति केली कीं आह्मी थोडासा विसांवा घेतों. **कौंट आलेन्सान** म्हणून **फ्रेंचांचा** सरदार होता,

त्यास

त्यास हें वर्तमान समजतांच तो घोड्यावर बसून आला; आणि त्यांस धिक्कारून बोलिला कीं, तुह्मीं भ्याड आहां; उठा, आणि युद्धाचा प्रारंभ करा. तेव्हांच मोटी एक पावसाची झड लागली, त्याणें त्यांचा धनुष्यांचा दोऱ्या शिथिल झाल्या; ह्मणून त्यांस अगदीं हुशारी नाहीं अशी झाली. मग त्याणीं रडत रडत लढाई केली; तीणें करून शत्रूंचा किमपि नाश झाला नाहीं. इकडे **इंग्लिशांनीं** आपलीं धनुष्यें गंवसण्यांत ठेविलीं होतीं, आणि त्यांस मध्यें थोडेंसें ऊन सांपडलें तेव्हां **फ्रेंचांस** भूल पडलीशी झाली. ह्मणून त्याणीं लक्ष्यें धरून मोठी दाट बाणाची वृष्टि केली, त्यामुळें **जिनोईस**[1] लोकांत धांदल होऊन ते परम भयभीत झाले. त्यांची धांदल पाहून **एड्वर्ड** राजाचा पुत्रानें आपली टोळी पुढें लढायास नेली. ते समयीं **फ्रेंचांचे** घोडेस्वारांचा सरदार **कौंट-**

---

१ जिनोईस ह्मणजे जिनो आदेशाचे राहणारे लोक. जिनो आदेश युरोप खंडाचे दक्षिणभागीं आहे.

**आलेन्सान** होता त्याणें **इंग्लिशांचे** सभोंवतीं घोडेस्वारांचा वेढा देऊन लढाई चालविली होती; तेव्हां राजपुत्र लढाईंत पुढें होता तें पाहून, **ओरंदेल** आणि **नर्थंपूटनाचे अर्ल** त्याचे मदतीस धावून गेले. तो राजपुत्र जेथें जाई तेथें विजयच चालून येतो असें दिसे. त्याचे सभोंवतें बहुत सैन्य जमा झालें होतें. त्याचें तें शौर्य पाहून मोठमोठे त्यातारे योद्धे विस्मित झाले; आणि त्यांचे मनांत असें भय उत्पन्न झालें कीं, हा यांतोन कसा निभावेल ? त्यास केव्हांतरी एकादा अपाय होईल अशी भयशंका वाटून **अर्लोनीं** राजास एके आसुदा बरोबर सांगून पाठविलें कीं, आपले पुत्रास कांहीं मदत पाठवून द्यावी. तों पर्यंत **एड्वर्ड** राजा एके पवनचक्कीवर उभा राहून स्वस्थपणें युद्धाची मौज पहात होता; त्यास निरोप पोंचतांच त्याणें किंचित् दुःख असें दाखवून पुसलें कीं, तो मेला कीं आजून जीवंत आहे ? तो जीवंत

आहे असें समजल्यावर राजा त्या आसुदास बोलिला, "अरे सरदार लोकांस माझा निरोप सांग कीं, मी कांहीं मदत पाठविणार नाहीं; आजचे दिवशीं जी प्रतिष्ठा मिळेल ती त्याची; त्याणें युद्धाविषयीं आपण योग्य आहें असें आज दाखवावें, आणि दुसऱ्या कोणाचे मदती वांचून विजय मिळवावा." हे राजाचे शब्द राजपुत्रास आणि त्याचे सोबत्यांस कळतांच त्यांस विशेष धीर आला. मग त्याणीं आवेशानें **फ्रेंचांचे** घोडेस्वारांवर हल्ला केला; त्या वेळेस **फ्रेंचांचा** परम शूर सरदार जो **कौंट आलेनूसान** तो पडला. तेव्हांपासून **फ्रेंचांचा** नाश व्हायास प्रारंभ झाला; कारण त्यांचा सरदार मेल्यामुळें ते घाबरे होऊन पळूं लागले. तेव्हां **इंग्लिशांनीं** त्यांचे पाठीस लागून, त्यांस जसे सांपडले तसे ठार मारिले. **इंग्लिश** असा विध्वंस करीत असतां सूर्य अस्तास गेला; तेव्हां ते शत्रूंस सोडून देऊन मागें फिरले. इत-

के

के थोडे लोक मरून असा जय **इंग्लिशांस** कधीं प्राप्त झाला नव्हता. शत्रूंचे लोक पुष्कळ मेले; परंतु यांचा एक **इस्कयर**, तीन **नैट**, आणि खालच्या पायरीचे कांहीं थोडे बहुत, इतके मेले. या लढाईंत **इंग्लिशांनीं** प्रथम चारतोफा चालू केल्या अशी कथा सांगतात.

या विजयापासून दुसरें मोटें हित झालें. तें असें. **एडूर्ड** राजा जसा पराक्रमी तसाच शाहणा असे. म्हणून पुढें **फ्रान्स** देशांत सहज जातां यावें याविषयीं कांहीं यत्न करायाचा निश्चय करिता झाला. या बेतानें त्याणें **कालेइस** शहरास जाऊन वेढा घातला; त्या किल्यावरचा सरदार जुना अनुभवलेला होता, त्याचें नाव **जान डी विएन**; आणि त्यांत पुष्कळ सामान ही भरलेलें होतें. असा हळूहळू उद्योग चालवून **एडूर्ड** राजानें तें काम सिद्धीस नेलें. त्या किल्यावरचे अधिकाऱ्यानें आपल्या कडून होईल तितका यत्न केला; शहरांत जे कोणी रिकामे लोक होते ते

बाहेर

बाहेर काढून दिले; त्यांस **एड्वर्डानें** ही थोरपणें जायाची मोकळीक दिली. हे सर्व त्याचे यत्न निष्फळ झाले. **एड्वर्डानें** त्या शहरांत दुष्काळ पाडून तें घ्यायाचे मसलतीनें वीस महिने पर्यंत वेढा घालून शेवटीं लोकांस धान्यादिकांचा तोटा पाडिला; आणि आपला मतलब सिद्धीस नेला. त्या लोकांनीं इतके दिवस आग्रह धरिला त्याचें कांहीं शासन करावें ह्मणून, लोकांतून मुख्य मुख्य सहा होते त्यांस मारावे असा त्याणें बेत केला. ते आपले गळ्या भोंवती दोऱ्या बांधून मार ह्मणून त्याजवळ आले; त्या वेळेस, राणीनें मध्यस्ती करून त्यांस वांचविलें.

या रीतीनें **एड्वर्ड** राजा महाद्वीपांत जयमिळवीत असतां, **स्काट** लोक, जांस सर्वदा लूट आणि नाश करायाची मोठी आवड असे, त्याणीं ही संधी साधून पुष्कळ सैन्य जमा करून **इंग्लंड** देशाचे कांठावर हल्ला केला. त्यांचा राजा **डेविड ब्रूस**, तोही त्यांचे बरोबर आला होता.

तशा

तशा प्रसंगीं अकस्मात् तो त्या लोकांच्या दंगा पाहून **इंग्लिश** चकित झाले; परंतु त्यांस किमपि भीति वाटली नाहीं. **एड्वर्ड** राजाचे मागें **इंग्लंडांतील** खबरदारी त्याचा मुलगा **लयोनल** ह्मणून होता त्यास सांगीतली होती. तो फार लहान ह्मणून त्याचानें युद्धाचें काम होईना; परंतु राजा विजयी होत चालिला तें पाहून बायकांस देखील हुशारी चढली. राजाची बायको **फिलिपा** ह्मणून होती, तिणें युद्धांतलें आधिपत्य स्वतां करून शत्रूंच्या पराजय करायाच्या निश्चय केला. मग ती **लार्डपर्सी** नामें गृहस्थ होता, त्याला आपले हाताखालच्या सरदार करून युद्धास गेली. तिची आणि **स्काच** लोकांची **दरहम** शहराजवळ **नेविलस्क्रास** यानावाचें ठिकाण आहे तेथें गांठ पडली; आणि लढाईचा आरंभ झाला. **स्काच** लोकांचा राजा लढाईविषयीं फार उतावीळ होता या करितां, त्यास असें वाटलें होतें कीं, **इंग्लिशांचे** फौजेस कां-

हीं बंदोबस्त नाहीं; आणि त्यांत मुख्य बायको आहे; या करितां मी यांचा सहज पराजय करीन. परंतु तो ठकला गेला. त्याची फौज सगळी लढाई सोडून पळाली; पंधरा हजार लोक मेले; मग **इंग्लिशांनी** त्यास आणि त्याचे बहुत नेष्ट सरदार यांस धरून मोठ्या उत्साहानें **लंडन** शहरास नेलें.

त्या नंतर लवकरच **पाइटियर्स** शहरा जवळ **ब्लाक्‌प्रिन्सानें**[1] विजय मेळविला. त्यांत **फ्रान्स** देशाचा राजा **जान**, यास धरून उत्साह करून पुष्कळ लोक पाहताहेत अशा समारंभानें **लंडन** शहरास नेला. एके दरबारांत दोन राजे एकदांच कैदेंत पडले हें लोकांस प्रतिष्ठित कर्म वाटलें; परंतु या पासून नुसता कीर्तिचा मात्र लाभ झाला. इतक्या युद्ध संकटांत प-

१ ब्लाक्‌प्रिन्स म्हणजे काळा राजपुत्र हें एड्वर्ड राजाचे लोकाचें नाव. तो काळें कवच धारण करी या मुळें त्यास हें नाव पडलें होतें.

डून; तसेंच, लढाईची सिद्धता कराया करितां पुष्कळ खर्च करून जें काय मिळविलें तें सगळें न फळत हळूहळू गेलें; इतकेंच मात्र कीं पराजय झाला नाहीं.

**इंग्लिशांनी** बहुत दिवस युद्धांत फौजेचा पुरावा केला; शेवटीं लढाईंत नवी फौज पाठवायाचें त्यांस सामर्थ्य राहिलें नाहीं. तिकडे **फ्रानूस** देशचा राजा कैदेंत होता तो **सेवाय** शहरांत मृत्यु पावला. तेव्हां त्याचे स्थानीं त्याचा पुत्र **चार्लिस** राज्य करूं लागला. तो मुद्दाम समोरासमोर लढाईचा प्रसंग चुकवीत असे. त्याणें असें मनांत आणून ठेविलें होतें कीं, आपले देशांत पुष्कळ किल्ले आहेत; मग **इंग्लिशांनी** तेथें उगीच आपलें बळ खरचलें तर काय चिंता? या रीतीनें त्याणें अगदीं उद्योग सोडून दिला पाहून, **इंग्लिश** उगीच श्रम करितां करितां थकून गेले. तें पाहून त्या **चार्लिस** राजानें जीं ठिकाणें त्याचाने राखविणार ना-

हीं अशीं होतीं त्यांवर आऊन हल्ला केला. पहिल्यानें त्याणें **पांथिउ** शहर घेतलें; **आबिल** शहरांतले लोकांनी तर त्यास दरवाजे उघडून आंत घेतला; **सेंटवाल्या, रु,** आणि **कोनाय,** या शहरचा लोकांनीही तसेंच केलें. मग थोडकेच काळांत सर्व देश त्याचे स्वाधीन झाला. याच रीतीनें त्याचे सरदारानीं राज्याचे दक्षिणे कडचे भाग घेतले; तेव्हां राजपुत्र **इंग्लंडांतून** पुरावा येत नाहीं, आणि जिकडे तिकडे धांदल झाली आहे, असें पाहून स्वदेशीं जाता झाला. तो गेला तेणें करून **फ्रान्स** देशाचे दक्षिणे कडेस अधिक गडबड झाली.

पुढें राजपुत्र मरण पावला; तेणें करून असें शोभायमान राज्य अतिविशोभित पडलें. तो शूर तसाच गुणी पुरुष शेचाळिसावे वर्षीं मरण पावला. त्याची मागें निर्दोष कीर्ति राहिली; आणि त्याचे मरणें करून जें लोकांस दुःख झालें, तें काळें करूनही आयास संकट पडलें.

पुन्हा

पुत्रासाठीं एड्वर्ड राजास तर अतिशय-च दुःख झालें; तें मनांतून जायासाठीं त्याणें बहुत यत्न केले. त्याणें राज्यभार आणि सर्व कामें सोडून दिलीं. तेव्हां त्याचें राज्य दुष्टमंत्री लुटूं लागले. असें अविचाराचें फळ आल्यावर तो फार दिवस वांचला नाहीं. पुत्र मेल्यावर तो एक वर्षानें सरे मांतांत शीन शहरीं सन १३७७ चे वर्षांत मरण पावला. पूर्वीं जे त्यापासून बक्षीस मिळवून द्रव्यवान् झाले होते, त्या सुद्धां सर्व सरदार लोकांनीं त्यास शेवटीं सोडून दिला त्याणें एकावन्न वर्षें राज्य केलें; आणि तो मेला त्या वेळेस त्याचे वयास पांसष्ट वर्षें होतीं. तो राजा असा होऊन गेला कीं, लोकांनीं त्यावर प्रीति करावी; आणि त्यास पाहून अधिक आश्चर्य पावावें; तसेंच त्या साठीं दुःखी व्हावें, आणि त्याची स्तुतिही करावी.

याच राज्यांत ग्योर्टर पदवीची उत्प-

---

१ युद्धादिकांत जे पुरुष पराक्रम करितात. त्यांस

मी फौजेच्या पुरावा करायाच्या लागत असे, ह्मणून उत्तरोत्तर लोक विशेष आंतून कुरकुरत. जिकडून तिकडून शत्रूंस संभाळायाकरितां लढाऊ गलबतें ठेविलीं होतीं, त्यांस बहुत खर्च लागे; आणि राज्यांत उधळपटी चालत असे; या कारणामुळें जामदारखाना केवळ रिकामा झाला होता. त्यांत कांहीं भर पडावी ह्मणून पार्लमेंटानें अशी आज्ञा केली कीं, पंधरा वर्षांचे वयावर जेवढीं मनुष्यें आहेत तितक्यानीं तीन ग्रोट[1] द्यावे. याचे पूर्वींच लोक संतापले होते; आणि तो कर मातबर गरीब यांस सारिखाच द्यावा लागतो, असें पाहून गरीब जा प्रजा होत्या, त्यांचा क्रोधाग्नि फारच प्रदीप्त झाला. त्याचा प्रारंभ एसेक्स प्रांतांत झाला. तो असा. त्या प्रांतांत कोणी मुद्दाम अशी बातमी उठविली कीं, सर-

---

१ चार पेनीचे वजनाचा तुकडा. हीं सर्व इंग्रजी मानें शिक्षामाला पुस्तकाचे प्रथम भागांत पहावीं.

कार

कार गरीब लोकांस पीडा करणार, त्यांचीं घरें जाळणार, आणि शेतें लुटणार आहे. त्या लोकांस प्रथम एके लोहारानें युद्धास प्रवृत्त केले; त्याचें नाव **वाटटैलर** असें प्रसिद्ध आहे. तो एके दिवशीं आपले घरीं काम करीत बसला होता; इतक्यांत, ते सरकार च्याकर पैका जमा करणारे तेथे गेले; आणि त्याचे मुलीच्या पैका मागूं लागले. तेव्हां तो बोलिला कीं, माझे मुलगीस कायद्यांत लिहिलीं आहेत तितकीं वर्षें नाहींत. तें ऐकून त्यांतून एके अमलदारानें आग्रह धरिला कीं, ही चांगली मोठी बायको आहे; आणि तो या गोष्टीच्या पुरावा कांहीं लाजिरवाणें कर्म करून करूं लागला. तें पाहून लोहारास भारी आवेश आला; आणि त्याणें त्या पुरुषास आपले घणाच्या एक तडाखा देऊन ठार मारून टाकिलें. त्या वेळीं लोक वाटेनें जात होते त्याणीं तें पाहून त्याचे धैर्याची स्तुति केली; आणि सर्वांनीं त्यास सहाय होऊन युद्ध करायाचा निश्चय केला. त्यास लोकांनीं आपला मुख्य केला. मग त्या ए-

कत्र झालेले लोकांनीं बहुत धुंदाई केली; सर्व जवळचे प्रांतांतले लोक युद्धास सिद्ध झाले; आणि जेथे ते गेले तेथे त्याणीं लुटलें आणि जाळिलें. धन्यापासून जीं पूर्वीं दुःखें सोसिलीं होतीं त्यांच्या त्याणीं या रीतीनें सूड उगवला. सर्व लोकांची राजावर इतराजी झाली होती म्हणून, जसें जसें तें बंड राजधानी जवळ येत चालिलें, तसे तसे त्यांस नवे लोक येऊन पुष्कळ मिळों लागले. तो क्रोधाग्नि मग **केंत, हरीफोर्ड, सरे, सफक, नार्फक, केंब्रिज, लिंकन** या प्रांतांत पेटूं लागला. ते **ब्लाकूहीथ** मैदाना जवळ आले तेव्हां, त्यांची मंडळी एक लाख जमली. त्यांतील एके टोळीच्या सरदास **वाटटैलर** होता; तो आपले लोक घेऊन **स्मिथ्फीलडांत** गेला; तेथें त्याची आणि राजाची भेट झाली. राजानें त्याशीं कांहीं खलबत करायाकरितां त्यास बोलावयास पाठविलें. त्यास कळविलें कीं, तुम्हीं भेटलेत म्हणजे तुमचीं काय संकटें आहेत तीं ऐकून आम्ही दूर करूं. **टैलरा-**

नें

नें आपल्या लोकांस सांगीतलें कीं, मी खूण करीं पर्यंत तुह्मी उगीच दूर असावें. असें सांगून तो मोठा धीर करून राजाचे स्वारींत जाऊन राजाशीं खलबत करूं लागला. त्या वेळेस जें त्याणें अविचारानें पुष्कळ मागणें केलें, त्याची सर्व ग्रंथकार निंदा करितात; परंतु तें सर्व योग्य होतें. तें असें. जितके सेवक आहेत तितक्यांस मुक्त करावे; सर्व जमीनींवर गरीब आणि मातबर यांचा अधिकार समान असावा; आणि सांप्रत जें राज्यांत बंड झालें त्याची क्षमा करावी. तो राजाशीं बोलते वेळेस मध्यें मध्यें डौलानें आपली तरवारवर उचली; तें पाहून **विलियमवालवर्थ**, **लंडन** शहरचा **मेयर** राजाजवळ होता त्यास फार राग आला; मग त्याणें राजाचें काय होईल हा कांहीं विचार न करितां, त्या **टैलरावर**

१ प्रांतांत एके मोठे गावांत सरकारचे अंमलदार असतात; त्यांतील माजिस्त्रेट ह्मणजे फौजदारीचें काम पहाणाराचें नाव मेयर.

आपले

आपले हातीं आयुध होतें तें मारिलें; इतक्यांत राजाचे एके नैटानें उठून तरवारीनें त्याचा वध केला. त्या बंडवाल्यानीं आपला मुख्य पडला पाहून लागलाच राजाचा सूड उगवायाचा यत्न आरंभिला; आणि आपलीं धनुष्यें नमविलीं. त्या वेळेस रिचर्ड राजाचें वय सोळा वर्षांचें नसतांही तो मोठ्या धीरानें घोड्यावर बसून त्या बंडवाल्यांजवळ गेला, आणि स्थिर मनानें बोलिला;" हे माझे प्रजाहो! तुह्मी आपले राजाचा वध करूं इछिता कीं काय ? तुमचा मुख्य मेला या साठीं तुह्मास वाईट वाटलें असेल, तर कांहीं चिंता करूं नका, मी स्वतः सरदार होतों; मला युद्ध करायाची मोकळीक द्या, ह्मणजे तुमचे मनांत आहे तें सर्व तुह्मास प्राप्त होईल." हें ऐकून ते भ्यालेले लोक तत्क्षणींच आपला उद्योग सोडिते झाले. ते युद्धा करितां राजाचा मागून गेले; त्याणें त्यांस पूर्वीं जसा नियम करून दिला होता तसा करून दिला; परंतु पुढें तो पार्लमेंटांत खोटा ठरवून रद्द केला.

ला.

त्या काळ पर्यंत राजा आपले दरबाऱ्यांचे आज्ञे प्रमाणें वर्तत असे; आणि ते त्याची सत्ता अगदीं कमी करायास यत्न करीत असत. परंतु त्याणें ईस्तेरा[1] नंतर सर्व कारभारी लोकांची मोठी सभा करून विचारिलें कीं, मला वय किती आहे? तें ऐकून सर्वांस आश्चर्य वाटलें. तेव्हां आपलें वय बावीस वर्षें आहे, असें कळल्यावर तो बोलिला कीं, तर आतां दुसऱ्याचे साहाय्या वांचून स्वतः राज्य करायाचा माझा समय झाला. माझा गरीब प्रजांसही जितकी सत्ता आहे तितकी मला नसावी याचें कारण कांहीं मला दिसत नाहीं. असें बोलून त्याणें अधिकार स्वाधीन करून घेतला खरा; परंतु जा गुणानीं लोकांची आपलेवर सतत प्रीति राहत्ये, ते त्या मध्यें नव्हते असें पुढें लवकरच कळूं आलें. तें असें. त्यास विषयोपभोगा-

१ ईस्तर म्हणून सणाचा दिवस एप्रिल्ल महिन्यांत येतो.

ची

१३९९ ची आणि दंभाची आवड असे; तो हलके लोकांशीं स्नेह ठेवी; आणि आपलें सामर्थ्य तशीच नीति यांची लोकांचे मनांत जरब बसावी असें त्याचें भाषण नसे. अशो गुणानीं अगोदरच राज्यांत त्या विषयींतिरस्काराचा उद्भव झाला होता; तशांत त्याणें **ग्लोसेस्तराचे ड्यूकास** कांहीं आरोप ठेवून **कालेइस** शहरांत पाठविला; आणि तेथें बंदींत ठेवून मारविला. हें आणि कितिएक दुसरीं दुष्ट कर्मे केलीं, तेणें करून तो तिरस्कार वृद्धि पावला.

राजानें कितिएक आपले मित्रांस एकाएकींच मोठ्या पदास चढविलें तेणें करूनही लोकांस राजाचा अधिक कंटाळा आला. अशा आचरणानीं लोकांची आपलेवर इतराजी करून घ्यावी असा त्याचा दृढ निश्चय दिसत होता खरा; परंतु तो पदच्युत होण्याचें कारण सहज घडोन आलें. तें असें. **हरीफोर्डाचे ड्यूकानें, नार्फोकाचे ड्यूकावर पार्लमेंटांत** असा आरोप

रोप ठेविला कीं, तो राजाशीं एकांतीं बोलत असतां कांहीं धट्टाईचे शब्द बोलिला. **नार्फोकानें** ती गोष्ट खोटी असें ह्मटलें; आणि **हरीफोर्डा** बरोबर अशी प्रतिज्ञा केली कीं, तूं आणि आपण लढाई खेळूं ह्मणजे माझे हातून तें कर्म घडलें नाहीं हा निश्चय होईल. सर्व **लार्डांनीं** त्यास संमती दिली. मग ती लढाई कोठे आणि केव्हां व्हावी तें ठरविलें; आणि सर्व लोक ती केव्हां होईल याची वाट पाहूं लागले. शेवटीं तो लढाईचा दिवस आला, तेव्हां त्या दोघांनीं युद्धाचा प्रारंभ केला; इतक्यांत राजानें तेथें जाऊन तें बंद केलें; आणि त्या दोघांसही राज्यांतून निघोन जावें ह्मणून आज्ञा केली. **नार्फोकाचे ड्युकास** जन्मपर्यंत बाहेर रहावें ह्मणून काढून दिला; आणि **हरीफोर्डास** दहा वर्षें पर्यंत रहायाची ठेप सांगीतली. असा एकानें कांहींच अपराध केला नसतां, आणि दुसऱ्याचे अन्यायाचा पुरावा नहोतां, राजानें

दोघां

दोघां करविणेंही देश त्याग करविला. ही आपली निष्कारण अवस्था झाली पाहून **नार्फोकास** परम क्लेश वाटून तो **वेनिस** शहरास निघोन गेला; आणि कांहीं दिवशीं फार दुःख झाल्यामुळें मृत्यु पावला. त्या प्रसंगीं **हरीफोर्डानें** विशेष विचारीपणानें वर्तणूक केली; तें पाहून राजा खुश झाला; आणि त्यास दाहा वर्षांची ठेप केली होती ती चार वर्षांवर आणिली. राजानें त्यास सनद करून दिली; ती अशी कीं, तो बाहेर असतां जें त्याचे वारशास येईल तें त्याणें भोगावें. परंतु पुढें लवकरच त्याचा बाप **लांकास्तराचा ड्युक** मेला, तेव्हां राजानें ती सनद फिरविली, आणि त्याची संपत्ति सरकारांत घेतली.

अशीं बहुत वेळ राजापासून दुःखें पावून, शेवटीं **हरिफोर्डाचे** मनांत राजा विषयीं फार त्रास उत्पन्न झाला; त्याणें तो तंव पर्यंत सोसिला; परंतु त्या समयीं अतिशय संतापून

तो त्या राजास पदच्युत करायाचा विचार करिता झाला. तो शांत, सावध, आणि दृढ मनाचा होता; ह्मणून तें काम करायास त्याचे सारिखें दुसरे कोणास सामर्थ्य नव्हतें. **लिथुनिया**[1] देशाचे नास्तिकांशीं लढाई झाली त्या वेळेस त्याणें मोठा शूरपणा प्रगट केला होता; तो भक्तिमान् आणि पराक्रमी असे; आंतोन दुःखें सोसून सोसून त्यास आवेश आला होता; आणि त्या जवळ आपला बेत सिद्धीस न्याया जोगी संपत्ति आणि सहायही होतें. मग तो इतकीच वाट पहात होता कीं, राजानें कोठें तरी बाहेर जावें, आणि आपण धुंदाई सुरू करावी. अशांत राजा **अयर्लंडांत** गेला ती त्यास संधि सांपडली.

तेव्हां तो साठ लोक बराबर घेऊन **नॉर्लून** शहरीं धाकटे तारवांत बसला; आणि **इंग्लंडांत** प्रांतांतले **रेवन्स्पर** गावांत आ-

---

[1] लिथुनिया हें सांप्रतचे **पोलंड** देशाचे एक भागाचें नाव.

ला. **नर्थंबलेंडाच्या अर्लेही** फार दिवस राजाशीं वांकडा होता; तो आणि तसाच त्याचा पुत्र **हेनरीपर्सी** ज्याचें शौर्यें करून **हाट्स्पर** असें नाव पडलें होतें, ते दोघे आपलीं सैन्यें घेऊन त्यास मिळाले. त्यानंतर त्याचे आश्रयास बहुत लोक येऊन राहूं लागले. अशी थोडे दिवसांनीं त्याची फौज साठ हजार जमली.

असें **इंग्लंडांत** वर्तमान असतां, राजा **रिचर्ड अयर्लंडांत** सुखानें वास करीत होता. आपले राज्यांत बंड झालें ही बातमी त्यास वारा उलटा होता या मुळें पाऊण महिना पर्यंत कळली नाहीं; म्हणून तो निर्धास्तपणानें वीस हजार फौजेनिशीं **मिल्फोर्ड** बंदरीं आला. तेव्हां त्याणें पाहिलें कीं, आपण क्रोध संतप्त लोकांमध्यें येऊन पडलों; या मध्यें एकही असा नाहीं कीं, ज्यावर विश्वास ठेविला असतां चिंता नाहीं. या राजाचा उदय काळांत ज्याणीं त्या करविणें पुष्कळ पातकें मात्र करविलीं असे जे पुरुष

होते

होते, तेही त्या वेळेस त्यास सोडून गेले. त्याजवळ जी कांहीं थोडी फौज होती, तीही त्याकडून निघोन जाऊं लागली; असें होतां होतां, शेवटीं त्याणें पाहिलें तों सहा हजार मात्र फौज जवळ राहिली. तेव्हां शत्रूंस शरण गेल्यावांचून दुसरा उपाय नाहीं असें पाहून, **रिचर्ड** राजानें **हरिफोर्डास** सांगून पाठविलें कीं, तुमची मर्जी जशी असेल तसें करायास मी सिद्ध आहें; आणि तुमचें माझें कांहीं बोलणें व्हावें अशी माझी परम उत्कंठा आहे. **हरिफोर्डानें** तें मान्य करून निरोप पाठविला कीं, **चेस्तर** शहरापासून दहा **मैलांवर** किल्ला आहे तेथें तुम्हीं यावें म्हणजे तुम्ही आम्ही बोलूं. दुसरे दिवशीं आपण सर्व सैन्य घेऊन तेथें गेला. त्याचा पूर्व दिवशींच **नर्थंबर्लेंडाचा ड्युक, रिचर्ड** राजास तेथें घेऊन गेला होता. **हरिफोर्ड** येतो असें भिंतीवरून पहातांच राजा खालीं जाऊन त्यास सामोरा गेला. तेव्हां **हरिफोर्डानें** कवच आं-

गावर

गावर धारण केलें होतें तसाच तो आंत गेला. त्या गरीब राजाचा मान इतका मात्र रक्षिला कीं, डोक्यावर कांहीं घातलें नाहीं. असें असतां, रिचर्ड राजानें त्याची मोठे आदरानें भेट घेतली; आणि भाषण केलें कीं, आपण उत्तम समयीं आलां. हा त्या राजाचा स्वभाव मोठा चमत्कारिक होता. तें पाहून हरिफोर्ड नम्र होऊन शांतपणें ह्मणाला "हे राजाधिराज! तुह्मी सांगीतलें होतें, त्या पेक्षें मी अमळसा लवकर आलों; याचें कारण; मी असें ऐकिलें कीं, एकवीस वर्षें पर्यंत तुह्मी अविचार पूर्वक राज्य केलें. अशा गुणानीं लोक तुह्मावर बहुत असंतुष्ट आहेत; परंतु ईश्वराचे इछेस आलें असतां या पुढें तरी चांगलें राज्य करायास मी तुह्मास सहाय होईन." या भाषणावर राजानें उत्तर

१ आपले पेक्षें जो मोठा असेल त्याजवळ उघडे डोक्यानें आणें हा त्याचा मान; अशी बिलयती लोकांत चाल आहे.

दिलें कीं " दहा, ही गोष्ट तुमचा मर्जीस आ-
ली, तस्मात् मलाही आवडली "

तें हरिफोर्डाचें सगर्व उत्तर ऐकून
रिचर्ड राजास दुःख झालें इतकेंच नाहीं. पु-
ढें त्यापेक्षां त्यास विशेष दुःखाचीं कारणें घड-
लीं. तीं अशीं. हरिफोर्ड, राजाचे सेवकांतून
एकाशीं कांहीं शब्द बोलिला; आणि त्यास त्या-
णें हुकुम केला कीं, राजाचे पागेंतलीं घोडीं बा-
हेर आणा. त्याणें दोन भिकारी तट्टें त्याजवळ
नेलीं. त्यांतून एकावर रिचर्डास बसविला;
आणि दुसऱ्यावर राजाचा स्नेही जो साल्सबरी-
चा अर्ल त्यास.अशी राजाची स्वारी चेस्त-
रास नेली. वाटेनें बहुत लोक बरोबर होते; आ-
णि करण्याच्या ध्वनि मोठा होत होता. ही राजा-
ची फजीती पाहून लोकांचे मनांत किमपि दया
आली नाहीं. या समारंभानें त्यास गांवोगांव
हिंडविला. त्या वेळेस सर्व लोकांनीं त्याची निं-
दा आणि त्याचे शत्रूची स्तुति केली. आमचा

कल्याण•

कल्याण कर्ता असा जो लांकास्तराचा ड्यूक तो बहुत काळ पर्यंत वांचो ! असा घोष होऊं लागला. या रीतीनें पुनःपुनः त्याची फजीती करून शेवटीं त्यास किल्यावर बंदींत ठेविला. असी निकृष्ट दशा पावल्यामुळें त्याची राजसंपत्ति आणि राजाभिमान याणींच त्या हतदैव राजास सोडून दिला असें नाहीं; जसा त्याचा अवस्थाभेद झाला तशी त्याची बुद्धिही खचली. मग त्याचा शत्रूनीं असा राजीनामा केला, कीं मी राज्य करायास अयोग्य, ह्मणून राज्य सोडून दिलें असे. त्यावर त्याची सही घ्यायास संकट पडलें नाहीं. तें झाल्यावर **हरिफोर्ड** आपणास राज्य असावें असें इछूं लागला; परंतु आपला अधिकार पायाशुद्ध व्हावा ह्मणून, त्याणें **पार्लमेंटाची** संमति घेतली. नंतर **रिचर्ड** राजाचें अपराधपत्र केलें, त्यांत तेहेतीस कलमें लिहिलीं; त्यावरून त्यास न्यायानें पदच्युत केला, आणि चतुर्थ **हेनरी** असें नाव ठेवून **हरिफोर्डास** रा-

आ केला. यार्क आणि लांकास्तर या दोन संस्थानांत असा तंटा प्रथम उत्पन्न झाला, तेणेंकरून पुढें कितिएक वर्षे पर्यंत राज्यांत रक्तें पडलीं; आणि शेवटीं राज्य व्यवस्था स्थिर झाली.

असा राजा रिच्चर्ड पदच्युत झाल्यावर नर्थंबर्लेंडाचे अर्लीनें, लार्डांचे सभेंत प्रश्न करायाचा उपक्रम केला कीं, रिच्चर्ड राजास पुढें कोणत्या रीतीनें ठेवावें याचा काय विचार ? त्यावर त्याणीं उत्तर दिलें कीं, त्यास एकाद्या चांगलें ठिकाणीं कैदेंत ठेवावा, कीं जेथें त्याचे मैत्र आणि साथी यांचा प्रवेश व्हावायाचा नाहीं. असा पुष्कळ बंदोबस्त केला; परंतु तो जीवंत होता तों पर्यंत हेनरीस सुख झालें नाहीं. पुढें कांहीं दिवसानीं राज्यांत बंडें आणि दंगे होऊं लागले; तेव्हां हेनरी, रिच्चर्डाचे मृत्यु करितां उद्योग करूं लागला. त्याणें त्यावर एक मारेकरी घातला; तो बरोबर आठ आसामी घेऊन हतभाग्य रिच्चर्ड, पामफ्रेट किल्यांत

त्यांत जा ठिकाणीं होता तेथें एकाएकीं गेला. त्यास पाहून त्याणें जाणिलें कीं यांचा बेत माझा जीव घ्यायाचा आहे. कोणत्यातरी उपायानें तो चुकवावा अशा निश्चयानें त्याणें त्यांतून एकाचा हातांतलें हत्यार काढून घेतलें; आणि तेणें करून चवघांस मारून आपले पायांजवळ पाडिले; परंतु शेवटीं त्याणीं एकवार करून त्याचा जीव घेतला. कितिएक ग्रंथकार ह्मणतात कीं तो बंदींतच असून अन्नासाठीं मेला. अशी गोष्ट त्याचे वयाचे चवतिसावे वर्षीं घडली. त्याणें राज्य तेवीस वर्षें केलें. त्याचीं कर्में वाईट खरीं; परंतु अन्यायापेक्षां त्यास शासन फार पडलें; आणि त्याणें दुःखें भोगिलीं तेणें करूनच शेवटीं बहुत लोक त्याचे कुटुंबास आणि पक्षास अनुकूळ झाले. त्याणें फार पवित्र कर्में केलीं असतीं तरीही तसें होतें नाहीं. त्यास धर्म स्त्रीपासून किंवा दुसरे कोणते रीतीची कांहींच संततिझाली नाहीं.

# प्रकरण १६

## चतुर्थ हेनरी राजाची कथा

### सन १३९९ पासून १४१२ पर्यंत



अपहारकाचें सिंहासन ह्मणजे कांट्यांची शेज, ही गोष्ट हेनरी राजास लवकर समजली. तो राज्य करूं लागल्यावर पार्लमेंटाचे पहिलेच सेशानांत सभासदांचा त्या विषयीं द्वेष बाहेर फुटला. असे प्रथमचे बखेडे त्याचे व्यवस्थितपणामुळें मोडले गेले खरे; परंतु नर्थंबर्लंडाचा अर्लानें जो केला तो मोठा बळकट झाला. तो होण्याचें मूळ असें. इंग्लिश आणि स्काच या मध्यें लहानशी एक लढाई झाली; तींत डौग्लासाचा अर्ल आर्चिबाल्ड, आणि दुसरे कितिएक मोठे स्काच लोक नर्थंब-

लंडाचे

लंडाचे अर्लानें धरून आन्विक किल्यास नेलें. ही बातमी राजा हेनरीस समजतांच, त्याणें अर्लास सांगून पाठविलें कीं, स्काच लोकांशीं तह करायाचे वेळेस कांहीं अधिक मागणें केलें पाहिजे; ह्मणून तुझ्याहातीं सांपडले आहेत त्यांस तसेंच कैदेंत ठेवायाची माझी इच्छा आहे; या साठीं तूं त्यांस पैका घेऊन सोडूं नको. या निरोपाचा नर्थंबर्लंडाचे अर्लानें धिक्कार केला; कारण, त्या काळचे युद्धनीती प्रमाणें तो जांस लढाईंत धरील त्यांस पैका घेऊन सोडून द्यायाचा त्यास अधिकार होता; आणि त्याचा मनांत होतें कीं, निर्भयपणा आणि राज्य हें राजावर आपलें ऋण आहे. हा अपराध मनांत धरून त्याणें राजास पदभ्रष्ट करायाचा उद्योग आरंभिला; जाणें राज्य मिळायास मुख्यत्वें साहित्यही त्याणेंच केलें होतें. मग त्याणें स्काच आणि वेल्श या लोकांची सेना एकत्र मिळवून मार्टिमर ह्मणून पुरुष होता, त्यास राज्य

द्यायाचे

द्याचे उद्योगास सहाय ह्मावें असा एक कावा केला. सर्व तयारी झाली; परंतु तो अर्ल,बेरिक शहरांत दुखण्यांत पडला, ह्मणून त्याचानें फौजेबरोबर जाववेना असें झालें. ही गोष्ट त्यास फार वाईट वाटली; परंतु त्याचा पुत्र हेनरीपर्सी, हाट्स्पर या मतिष्ठानावाचा त्या सैन्यांत होता, त्याणें बाप नव्हता ह्मणोन कांहीं न्यून पडूं दिलें नाहीं. ग्लेंडर ह्मणून एक वेल्श् सरदार त्या पूर्वीं कांहीं दिवस बंदींतून सुटला होता, तो आपली फौज घेऊन श्राप्‌ मांता पर्यंत पोहोंचला; त्यास आऊन मिळायाकरितां तो पर्सी आपली फौज घेऊन श्रुसबरी जवळ गेला. तीं दोन सैन्यें एकत्र झाल्यावर त्याणीं राजापासून आपणावर झालेले जुलुमाचा मोठा विस्तार लिहून प्रसिद्ध केला. या बंडाचें वर्तमान ऐकून हेनरी मोठा विस्मित झाला; परंतु त्या काळीं दैव त्यास अनुकूल होतें. त्या जवळ थोडीशी फौज तयार होती, ती

घेऊन स्काच लोकांशीं लढाई करायाची त्यागें निश्चय केला; आणि त्या बंडवाल्यांशीं युद्ध करावें ह्मणून तो त्वरेनें श्रूसबरीस निघोन गेला.

तीं दोन सैन्यें जवळ जवळ आलीं तेव्हां, आप आपले पक्षास सुशोभितपणा दाखवायाकरितां सल्ला करून तंटा मोडावा अशी उभयपक्षींची इच्छा दिसली; परंतु मागणीं करून ठराव होऊं लागला तेव्हां तहाचें तंट्यावर गेलें; आणि परस्परांची भर्त्सना करण्यास प्रारंभ झाला. एक पक्षीं बंडेयपणा आणि अनुपकरिता; तशीच दुसरेकडे अपहारकता, आणि औद्धत्य होतें; ह्मणून परस्परांची निंदा करूं लागले. एक एकाचे सैन्यांत फौज सुमारें बारबारा हजार होती; आणि त्या दोहों मध्यें द्वेषही फार वाढला होता. मग युद्धाचा प्रारंभ झाला, त्यामध्यें उभयपक्षींचे सरदारानीं मोठ्या शौर्यानें बंदोबस्त राखिला; जेथें लढाई दाट होई तेथें हेनरी आहे असें

दिसे

दिसे; आणि जो पुढें **फ्रान्स्** देश घेऊन विख्यात झाला असा त्याचा पुत्र, तोही त्याचे जवळ असून युद्ध करी. त्याचे तोंडावर एक बाण लागला, तरी त्याणें युद्ध न सोडितां बहुत पराक्रम केला. तिकडे **हाट्स्परानें** ही बहुत संग्रामांत जी कीर्ति संपादिली होती ती गमाविली नाहीं. राजा कसा तरी हातीं यावा या विषयीं त्याणें फार प्रयत्न केला. शेवटीं कोणी नकळत त्यावर बाण मारून त्यास मारिलें; तेव्हां युद्ध समाप्तीस गेले; आणि **हेनरी** राजाचें दैव पुनः एकवेळ फळलें. त्या दिवशीं सुमारें दोन हजार तीनशें प्रतिष्ठित गृहस्थ मेले, आणि दुसरे लहान सहा हजार पडले; त्यांतून दोन तृतीयांश **हाट्स्पराचे** सैन्यांतले; अशी कथा सांगतात.

असें भयंकर कर्म चाललें असतां, **नर्थंबर्लंड** दुखण्यांतून बरा होऊन कांहीं फौज घेऊन बंडवाल्यांचे मदतीस जात होता; तेव्हां त्याणें वाटेनें आपला मुलगा आणि भाऊ

यांची

यांची विपत्ति श्रवण केली. त्या वेळेस विजयें क-
रून त्यदून गेलेली जी शत्रूंची पुष्कळ फौज ति-
जपुढें थोडें सैन्य घेऊन त्यास आयाच्या धीर हो-
ईना; म्हणून त्याणें लोकांस निरोप दिला. मग
कांहीं दिवस पर्यंत तो अर्ल पळून जाऊन त-
री निर्भय व्हावें असा प्रयत्न करीत होता. परं-
तु जिकडे तिकडे लोक पाठीस लागल्या मुळें केव-
ळ निरुपाय झाला; आणि समजला कीं, जन्मव-
र कोठें देशांतरीं राहून दारिद्र्य दुःख भोगावें,त्या
पेक्षें राजासच शरण आवें हें चांगलें. असें म-
नांत आणून तो यार्क शहरांत आऊन हेन-
री राजास भेटला; आणि बोलिला कीं; मी लढा-
ईची तयारी केली याचें कारण इतकेंच कीं, मा-
र्टिमर आणि आपण या दोघांमध्यें मध्यस्थी क-
रून तंटा मिटवावा, हें त्याणें कारण सांगीतलें,
तें लहान तर खरें; परंतु त्याणें राजाची खातरी
होऊन अर्लास क्षमा मिळाली. बहुधा हेनरी
राजानें मनांत असें आणिलें असेल कीं, सैन्य

नाश

नाश पावलें, आणि प्रियपुत्र मेला, हें याचें पु-
ष्कळ शासन झालें.

अशी राज्यांत स्वस्थता झाली; तीणें क-
रून राज्याचे प्रारंभीं कांहीं दौरात्म्य आचरण
केल्यामुळें आपली लोकांत अपकीर्ति झाली
होती, तिचा विसर पडावा अशी राजाचे मनांत
इछा होती. या करितां पूर्वीं जी प्रतिनिधी जवळ
सत्ता नव्हती ती त्याणें त्यास दिली. त्याचे राज्या-
चे सहावे वर्षीं, त्याणीं त्यास खर्चाची पुरवणी
करण्या करितां संमति दिली; तेव्हां पैका आ-
तो याचा खर्च होतो कीं नाहीं हें पहाया करितां
त्याणीं आमदार नेमिले; आणि त्याणीं आपले हि-
साब आणून दाखवावे असा हुकुम केला. तसाच
राजाचे घरगुती खर्च वेचाचे वगैरे बंदोबस्ता प्रक-
रणीं तीस कलमाचा कायदा ठरविला. सारांश,
पूर्वींचा सर्व राजांपेक्षां चतुर्थ हेनरीचे राज्यां-
त त्यांची सत्ता आणि अखत्यार नीट चालिले.
एक वेळ गेलेली कीर्ति पुनः मिळवायाचें हेन-

री

री राजाचे या प्रकारचे उद्योग सफळ होत चा-
लिले असतां, त्याचा पुत्र हेनरी याचा प्रयत्न
लोकांचा द्वेष संपादन करायाकरितां चालिला
होता. तो सर्व रीतीचा व्यभिचार करी, अशी
त्याची प्रसिद्धि होती; त्या जवळ नेहमी हलके
लोकांची मंडळी असे; आणि तो त्यांत मुख्य हो-
त्साता नाना प्रकारचीं दुष्कर्में करीत असे. त्या
राजपुत्रानें पूर्वीं बहुत वेळ आपलें शौर्य, सुवृत्त,
आणि औदार्य यांचा प्रचीति दाखविल्या हो-
त्या; परंतु त्या वेळस आपले थोर पदवीची त्या-
स केवळ विस्मृति पडून तो दुराचरणीं प्रवृत्त झा-
ला; असें पाहून राजा हेनरीस परम दुःख वा-
टत असे. त्याचे अविनयाची इतकी पराकाष्ठा
झाली कीं, त्याचा एके सोबत्यास कांहीं अन्या-
याची चौकशी करायासाठीं राजाचा मुख्य
न्यायाधीश सर विलियम ग्यासकाइ-
न होता त्याणें बोलावून नेला. राजपुत्रास तें
पाहून क्रोध आला, आणि भरकचेरींत त्याणें

न्याया

न्यायाधीशाचा तोंडांत मारिलें. त्या वेळेस आपले पदाचा मानाप्रमाणें तो न्यायाधीश आपले थोरपणास योग्य जसें, तसें वर्तला; आणि त्याणें हुकुम केला कीं, राजपुत्रास नेऊन बंदींत ठेवावा. हेनरी राजा मनुष्यमात्राचा यथायोग्य परीक्षक होता; त्यास तें वर्तमान समजतांच मोठ्या हर्षानें तो बोलिला; "अशे अपराध्यांचें शासन करायास ज्या मध्यें धीर, असा न्यायाधीश ज्या जवळ आहे त्या राजाचें दैव काय सांगावें? आणि ज्याचा पुत्र त्याचे शासनास अनुकूळ होतो, त्याच्या भाग्योदय तर विशेषच." याचे पूर्वीं अशा कथा वाचिल्या आहेत कीं, न्यायाधीश म्हणजे राजाचे मर्जीप्रमाणें वागणारा; राजाचे सनेशीं विरुद्ध न्यायाधीश चालिला अशी ही कथा प्रथमच आली.

पूर्वीं कांहीं दिवस हेनरी राजाची शरीरप्रकृति बरी नव्हती, म्हणोन तो हें वर्तमान झाल्यावर फार दिवस वांचला नाहीं. त्यास नेहमी·

मी मूर्छा येत असे, आणि शुद्ध नाहीं अशी होई; त्याणेंच शेवटीं तो वेस्त्‌मिनूस्तरांत मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचें वय शेचाळीस वर्षांचें होतें. त्याणेंचवदा वर्षें राज्य केलें.

---

## प्रकरण १७

### पंचम हेनरी राजाची कथा.

सन १४१२ पासून १४२२ पर्यंत.

---

या राजानें प्रथम चांगलें आचरण केलें. त्याणें पूर्वींचे आपले लुच्चे सोबत्यांस बोलावून आणिलें; आणि सांगीतलें कीं, पुढें चांगले गुण धरावे असें माझे मनांत आहे, तर तुम्ही ही असेंच करा. असा उपदेश करून त्यांस लावून

न दिलें. त्यांस तेव्हां उपजीविके पुरतें मात्र स्वास्थ्य करून दिलें; आणि सांगीतलें कीं, तुम्हीं दुर्व्यसनें सोडून योग्य झाला असें मला दिसलें, म्हणजे मी तुमची कांहीं तरी मोठी सोई करीन.

•पूर्वीं त्याचा बापाचे वेळेस कारभाऱ्यानीं आपला धर्म वास्तवीक आचरण केला होता, म्हणून त्यांचे मनांत भय होतें; परंतु आश्वासन देऊन त्याणें त्यांशीं सख्य केलें. सरविलियम ग्यास्काइन म्हणून पूर्वीं न्यायाधीश सांगीतला, तो तर फारच भय पावला होता कीं, राजा आपणाशीं अधिक द्वेष करील; परंतु राजानें त्यास योग्य अशी स्तुति करून बोध केला कीं, पक्षपातावांचून आणि निर्दय चित्तानें पुढेंही असाच न्याय करीत जावा.

पूर्वीं जास विक्लिफाचें पाखंड, किंवा लालर्डिझ्म (धर्मांतर व्यवस्थेचें मूळ) म्हणत असत तें त्या समयीं उत्पन्न झालें; आणि दिवसानुदिवस जिकडे तिकडे पसरत चा-

लिलें

लिलें. काभम शहरचा बारन जो सरजान ओल्डक्यास्तिल, त्याचे साहित्यानें, आणि तो त्यास साधक भाषण उघड सभेमध्यें करीत असे, तेणें करून तें मत वाढत चालिलें. तो राजाचे घरगुती कामगारांतला एक होता, आणि त्यावर राजाची फार कृपा होती. महाधर्माध्यक्षानें त्यास धरून नेऊन, आणि आपले दुसरे बिशपांचे मदतीनें, त्यास स्वेछाचारी ठरवून जीवंत पुरावा असा हुकुम केला. त्यास किल्यावर ठेविला होता, तेथून तो मारायाचे पूर्वरात्रीं पळून आपले पक्षाचे लोकांजवळ चोरून गेला; आणि त्यांस धीर देऊन आपले शत्रूंचा अकस्मात् सूड उगवाया करितां लंडनास घेऊन चालिला. राजास त्याचा बेत समजला, म्हणून त्याणें शहरचे दरवाजे लावायाचा हुकुम केला. मग आपण कांहीं लोक बरोबर घेऊन रात्री सेंटजैल्स् फील्डांत गेला. त्याठिकाणीं जेवढे बंडवाले होते तितक्यांस धरिलें; आणि पुढें कि-

तिएक टोळ्या नेमलेले ठिकाणीं जोत होत्या त्यां सही हस्तगत केलें. त्यांतून कितिएकांचा शिरच्छेद केला; आणि बहुतांस क्षमा केली. त्यावेळेस काभम तर सुटून पळाला; परंतु पुढें चार वर्षांनीं तो सांपडला. त्या कडून जीं दुःखें भोगिवलीं, तीं मनुष्यास कधीं पूर्वीं सुचलीं नव्हतीं. त्याचे शरीराचा मध्य भाग सांखळेनें बांधून हलका विस्तव पेटवून त्यास जाळिलें.

अशीं दुष्टकर्में लोकांचा मनांतून जावीं म्हणून हेनरी राजानें बेत केला कीं, फ्रान्स देश यावेळेस मोठ्या विपत्तींत आहे, तर तेथें जाऊन आपलें कार्य साधावें. मग त्याणें सोथंपतन शहरांत पुष्कळ फौज आणि गलबतें जमविलीं. तेव्हां त्याजवळ सहा हजार स्वार आणि चोविस हजार पायदळ जमलें. त्यांत बहुत करून तिरकमठेवाले फार होते. असा तो जाऊन हार्फुअर गावांत उतरला. त्याचे शत्रूंस युद्ध करायाचें विशेष सामर्थ्य नव्हतें; परंतु

तु शत्रूनीं कर्तव्य जें काम तें तेथील हवेनेंच सि-
द्धीस नेलें. तें असें कीं कांहीं एक जातीच्या रोग
उत्पन्न होऊन हेनरी राजाचे सैन्याचे तीन चतु-
र्थांश केले. तेव्हां तो पश्चात्ताप पावला कीं, जेथें
रोग आणि बलिष्ठ सैन्य हीं जिकडून तिकडून ना-
श करितात, तेथें आपण आलों हा मूर्खपणा के-
ला. मग त्याणें कालेइस शहरांत जाऊन रा-
हयाची मसलत केली.

राजा तेथें जात असतां, वाटेंत राहून त्या-
च्या घात करावयाच्या शत्रूनीं बेत केला होता. म्ह-
णून तो बुांजी शहराजवळची तर्नोइस नदी
उतरला तों, आजिन्कोर्टाचे मैदानांत फ्रेंचां-
चीं सर्व फौज पाहून चकित झाला. त्याचें सै-
न्य अशो ठिकाणीं येऊन पडलें कीं, युद्ध केल्या-
वांचून पुढें जातां येऊंच नये. त्या वेळेस तो प-
रम प्रतिकूळ अवस्थेंत पडला. दुखण्यानें फौजे-
चा नाश झाला; श्रमानें शिपाई थकले; सामान
नाहीं; आणि मागें फिरल्यामुळें हिमतही खच-

चली

च्चली. त्याची सर्व फौज सुमारें नऊ हजार होती; आणि अशा सेनेस दहापट फौज; शूर सरदार; आणि सामान सुमान पुष्कळ; अशांशीं युद्धास उभें रहायाचा प्रसंग आला. फ्रेंचांजवळ सैन्य पुष्कळ आहे असें पाहून त्याणें दोन अरण्याचे मध्यें एक अरुंद स्थळ होतें तेथें तळ दिला. त्या दोन अरण्याचा सैन्याचे दोनही बाजूंस बंदोबस्त होता; म्हणून तेथें तो स्वस्थपणें शत्रूनीं हल्ला करायाची वाट पहात राहिला. फ्रेंच सैन्याचा सरदार फ्रान्स देशाचा कानूस्तेबूल* होता; आणि इंग्लिशांचे फौजेंत स्वतः हेनरी राजा, आणि यार्कचा ड्युक एड्वर्ड हे होते. कांहीं वेळ पर्यंत दोनही फौजा अशा युद्धाचा प्रारंभ करायास भ्याल्या काय, तशा एकमेकाकडे पहात राहिल्या; आणि चढून

* कानूस्तेबूल म्हणून जुना फ्रेंच लोकांत किताब असे. आतां कोतवालाचे हाताखालीं जो कामगार असतो, त्यास कानूस्तेबूल म्हणतात.

जाऊन